**केंद्र पुरस्कृत एकात्मिक बाल विकास सेवा योजना बळकटीकरण व पुनर्संरचना अंतर्गत "अतिरिक्त अंगणवाडी सेविका तथा पोषण समुपदेशक" या मानधनी पदावर मदतनीस यांना नियुक्ती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१४/प्र.क्र.२८२/का.६**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : **१५ नोव्हेंबर, २०१४**

<u>वाचा</u> :- १) केंद्र शासनाचे पत्र क्र.१-८/२०१२-सीडी-१, दिनांक २२ ऑक्टोंबर, २०१२
२) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१४/प्र.क्र.६९/का.०६, दिनांक ३०.०४.२०१४
३) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१२/प्र.क्र.४२९/का.०६, दिनांक १३.०८.२०१४ व शासन शुध्दीपत्रक दिनांक २१.१०.२०१४

**<u>प्रस्तावना</u> :-** एकात्मिक बाल विकास सेवा योजना बळकटीकरण व पुनर्संरचना या योजनेअंतर्गत देशात निवड करण्यात आलेल्या जिल्हयांमध्ये महाराष्ट्राच्या २० जिल्हयांचा समावेश करण्यात आलेला असून या जिल्हयातील अंगणवाडी केंद्राकरीता एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत बळकटीकरण व पुनर्संरचना अंतर्गत, "अतिरिक्त अंगणवाडी सेविका तथा पोषण समुपदेशक (Additional Anganwadi Worker cum Nutrition Counseller)" चे मानधनी पद निर्माण करण्यात आलेले असून सदरचे पद हे पूर्वीच्या नियमित अंगणवाडी सेविका / अंगणवाडी मदतनीस या संवर्गापासून वेगळे असून रु.३०००/- प्रतिमाह एवढे मानधन निश्चित करण्यात आले आहे. या खर्चात केंद्राचा हिस्सा ७५% व राज्याचा हिस्सा २५% आहे. यापूर्वीच्या अंगणवाडी सेविका/मदतनीस करीता केंद्राचा हिस्सा ९०% व राज्याचा हिस्सा १०% आहे. याव्यतिरिक्त या मानधनी पदाकरीता राज्याचे अतिरिक्त मानधन अनुज्ञेय नाही. राज्याच्या सदर २० जिल्हयातील "अतिरिक्त अंगणवाडी सेविका तथा पोषण समुपदेशक" ही पदे भरतेवेळी १० वी उत्तीर्ण असलेल्या व दोन वर्ष सेवा झालेल्या मदतनीसांना नियुक्ती द्यावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे शासनाने निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-** राज्याच्या २० जिल्हयातील "अतिरिक्त अंगणवाडी सेविका तथा पोषण समुपदेशक" ही पदे भरतेवेळी १० वी उत्तीर्ण असलेल्या व दोन वर्ष सेवा झालेल्या मदतनीसांना खालील अटींच्या अधिन राहून नियुक्ती देण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. "अतिरिक्त/दुसरी अंगणवाडी सेविका तथा पोषण समुपदेशक" या पदावर नियुक्ती स्विकारणा-या पात्र मदतनीसला केंद्राकडून निश्चित केलेले (केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा) मानधन देय राहील. सदर

अतिरिक्त अंगणवाडी सेविकांना पूर्वीच्या सेविकांकरीता राज्याकडून देण्यात येत असलेले अतिरिक्त मानधन देय होणार नाही.

२. **"अतिरिक्त अंगणवाडी सेविका तथा पोषण समुपदेशक"** हे मानधनी पद केंद्र शासनाची या पदाला मान्यता असेपर्यंतच कार्यरत राहील. हे पद संपुष्टात आल्यानंतर या पदावरील **"अतिरिक्त अंगणवाडी सेविका तथा पोषण समुपदेशकांची"** सेवा आपोआप संपुष्टात येईल.

३. विद्यमान अंगणवाडी सेविका, मिनी अंगणवाडी सेविका व मदतनीसांना लागू करण्यात आलेले सेवासमाप्तीनंतरचे एकरकमी लाभ योजना **"अतिरिक्त अंगणवाडी सेविका तथा पोषण समुपदेशक"** यांना लागू राहणार नाही.

४. **"अतिरिक्त अंगणवाडी सेविका तथा पोषण समुपदेशक"** हे पद संपुष्टात आल्यानंतर मदतनीस या पदावरुन स्वेच्छेने **"अतिरिक्त अंगणवाडी सेविका तथा पोषण समुपदेशक"** या पदावर पदोन्नतीने नियुक्ती स्विकारलेल्या मदतनीसांना त्यांचे मूळ पदावर सामावून घेतले जाणार नाही. कारण मदतनीसचे पद रिक्त झाल्यानंतर त्वरीत भरणे आवश्यक असते.

५. अंगणवाडी सेविका, मिनी अंगणवाडी सेविका व मदतनीस या मानधनी पदावरील नियुक्ती संबंधीचे वरील वाचा येथील अ.क्र.३ येथील शासन निर्णय, दिनांक १३ ऑगस्ट, २०१४ मधील (बालवाडी सेविकांमधून अंगणवाडी सेविका, मदतनीस पदावरुन अंगणवाडी सेविका पदोन्नती इत्यादी वगळून) अटी लागू राहतील.

६. नियमित "अंगणवाडी सेविका" व "अतिरिक्त अंगणवाडी सेविका तथा **पोषण समुपदेशक**" ही वेगवेगळी पदे असून यांचे मानधनाचे दर, कामाचे स्वरुप व जबाबदा-या भिन्न आहेत. त्यामुळे या दोन पदांना स्वतंत्र समजण्यात येऊन ही पदे एकसारखी समजण्यात येऊ नयेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११५१५४९१४८४३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: CN = Dilip Babasaheb Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Women & Child Development
Reason: I am the author of this document
Date: 2014.11.21 10:38:36 +05'30'

**(दि. बा. पाटील)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
५. मा. सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
६. सर्व विभागीय आयुक्त
७. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई
८. राज्य अभियान संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीरण व पुनर्संरचना प्रकल्प, रायगड भवन, नवी मुंबई
९. राज्य प्रकल्प संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीरण व पोषण सुधारणा प्रकल्प, रायगड भवन, नवी मुंबई
१०. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
११. महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, औरंगाबाद
१२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
१३. सर्व जिल्हाधिकारी
१४. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१५. सर्व महानगरपालिका आयुक्त, महानगरपालिका
१६. सर्व विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास विभाग
१७. सर्व मुख्य अधिकारी, नगरपालिका,
१८. प्राचार्य, मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्र (सर्व)
१९. प्राचार्य, अंगणवाडी कार्यकर्ती प्रशिक्षण केंद्र (सर्व)
२०. सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण), जिल्हा परिषद
२१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
२३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२४. सर्व मंत्रालयीन विभाग
२५. महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
२६. निवड नस्ती (कार्यासन ६)